लेखापरीक्षक श्रेणी-१ संवर्गातून विशेष लेखा परीक्षक वर्ग-२, सहकारी संस्था, गट-ब संवर्गात पदोन्नती देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सहक-१२१३/प्र.क्र.३११/१२-स**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम काम मार्ग,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

तारीख: २४ एप्रिल, २०१५

<u>वाचा</u>:- १) स.प.व व.वि., शासन निर्णय क्र.राजस-१२०८/प्र.क्र.९४/१२-स, दि.३०.०५.२००८

२) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आस्था/कक्ष-१/लेपश्रे-१/पदोन्नती प्रस्ताव/२००९, दि.११.०८.२००९

३) या विभागाचा शासन निर्णय क्र.राजस-१२०९/प्र.क्र.१४१/१२-स, दि.०८.०६.२०१०

४) मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांचे दि.१९.१२.२०१२ चे आदेश

५) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आस्था/कक्ष-१/वै(एम.एस.एल व इतर )/पदो/१९९/१५, दि.१०.०३.२०१५ **व** दि.१६.०३.२०१५ चे पत्र.

<u>**प्रस्तावना :-**</u>

सहकार आयुक्त कार्यालयाच्या दि.११/८/२००९ च्या पत्रानुसार लेखापरिक्षक श्रेणी-१ या संवर्गातून विशेष लेखापरीक्षक,सहकारी संस्था,वर्ग-२ या संवर्गात दि.०१/०१/२००७ च्या राज्यस्तरीय सेवा ज्येष्ठता यादीनुसार पदोन्नती देण्याचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला. त्यानुसार शासन निर्णय क्र राजस-१२०९ /प्र.क्र.१४१/१२-स, दि.८/६/२०१० अन्वये लेखापरीक्षक श्रेणी १ (वर्ग-३) मधून विशेष लेखापरीक्षक वर्ग-२ मध्ये ४५ अधिका-यांना सरळसेवेच्या कोटयातुन तदर्थ पदोन्नती देण्यात आली. तथापि, दि.८/६/२०१० च्या शासन निर्णयामध्ये श्री.मनोज लाखे, लेखापरिक्षक श्रेणी-१ यांना कनिष्ठ असलेल्या कर्मचाऱ्यांना पदोन्नती देण्यात आली. मात्र श्री. लाखे यांना पदोन्नती न मिळाल्याने सदर आदेशाविरुध्द त्यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दि. १/४/२०१२ रोजी मूळ अर्ज क्रमांक ३२८/२०१२ दाखल केला. मा. न्यायाधिकरणाने सदर अर्जाच्या सुनावणीमध्ये प्रस्तुत प्रकरणी खाते परीक्षा संदर्भातील शासन परिपत्रक दि.१६/१२/१९८३ नुसार सुधारित सेवाज्येष्ठता यादी मध्ये श्री.लाखे यांना दि.१/१/२००५ च्या सेवाज्येष्ठता यादीमध्ये स्थानांक मिळाल्यामुळे श्री.लाखे यांच्या नावाचा समावेश दि.१/१/२००७ च्या सुधारित राज्यस्तरीय सेवाज्येष्ठता यादीमध्ये झाला असता, हा

अर्जदार श्री.लाखे यांचा मुद्दा मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी मान्य करुन " सदर प्रकरणी सुधारित सेवाज्येष्ठता यादी तयार करुन त्यानुसार श्री.लाखे व इतर पात्र कर्मचाऱ्यांना मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण यांनी दिलेल्या निर्णयापासून चार महिन्याच्या आंत पदोन्नती द्यावी" असे आदेश दिनांक १९/१२/२०१२ रोजी दिलेले आहेत. परंतू मा.न्यायाधिकरणाच्या आदेशाप्रमाणे श्री. लाखे व इतर यांना पदोन्नती देणे शक्य झाले नसल्याने, श्री.लाखे यांनी दि. २२/४/२०१३ रोजी अवमान याचिका क्रमांक ३२/२०१३ दाखल केली आहे. सदरहू अवमान याचिकेमध्ये दि. ०४/०३/२०१५ रोजी झालेल्या सुनावणीमध्ये मा.प्रशासकीय न्यायाधिकरणाच्या दि.१९/१२/२०१२ च्या न्यायानिर्णयानुसार दि.१७/०३/२०१५ पर्यन्त अंतिम आदेश पारित करण्याबाबत आदेशीत केले. श्री.लाखे व इतर यांना पदोन्नती देण्याच्या अनुषंगाने सन २००९ च्या निवडसूचीतून लेखापरिक्षक श्रेणी-१ या संवर्गातून विशेष लेखपरिक्षक, वर्ग-२ संवर्गामध्ये नियमीत व तदर्थ पदोन्नती देण्यासाठीचा प्रस्ताव सामान्य प्रशासन विभागास सादर करण्यात आला असता, सामान्य प्रशासन विभाग/का.१२ यांनी त्यांच्या दि. १२/०३/२०१० च्या टिप्पणीन्वये नियमीत पदोन्नतीसाठी ७ पदे व तदर्थ पदोन्नतीसाठी ४१ अशा एकुण ४८ कर्मचाऱ्यांच्या तदर्थ निवडसूचीस निव्वळ तदर्थ स्वरुपात सहमती दर्शवून, यापूर्वी सन २००७-०८ मधील निवडसूचीतील कर्मचाऱ्यांनी जातवैधता प्रमाणपत्र सादर केले नसल्याने त्यांना पदोन्नती दिलेली नाही, अशा ५ कर्मचाऱ्यांसाठी त्या प्रवर्गाची पदे रिक्त ठेवण्यात यावीत असेही अभिप्राय दिलेले होते. त्यानुसार सदरहू ५ कर्मचाऱ्यांसाठी त्या-त्या प्रवर्गाची पदे राखून ठेवण्यात आली. मात्र उर्वरित २ तदर्थ पदोन्नत सेवाजेष्ठ अधिकाऱ्यांना नियमित कोटयात पदोन्नती देण्याबाबतचे आदेश पारित करण्यात आले नाहीत. यास्तव सदरहू बिंदूवर २ तदर्थ पदोन्नत सेवाजेष्ठ अधिकाऱ्यांना नियमित कोटयात पदोन्नती दिल्यानंतर २ पदे उपलब्ध होतात. तसेच सन २००७ च्या सेवा ज्येष्ठतायादीनुसार एकूण ५२ कर्मचाऱ्यांना तदर्थ पदोन्नती दिलेली आहे. यापैकी ३ तदर्थ पदोन्नत झालेले परंतु आता सेवा ज्येष्ठतेनुसार कनिष्ठ असलेल्या विशेष लेखपरिक्षक, सहकारी संस्था, वर्ग-२ या संवर्गातील ३ अधिकाऱ्यांना श्री.डी.एस.गायकवाड (से.ज्ये.क्र.६७), श्री. ए. व्ही. संख्ये (से.ज्ये.क्र ७८) व श्री.एस.एस.भंडारे (से.ज्ये.क्र. २२६) पदावनत केल्यास ३ पदे उपलब्ध होतील. दि.८/६/२०१० च्या आदेशान्वये पदोन्नती देतांना श्री.लाखे व इतर यांना कनिष्ठ असलेल्या कर्मचाऱ्यांना तदर्थ पदोन्नती दिलेली आहे, ही बाब विचारात घेवून दि.०१.०१.२००९ च्या अंतिम सेवा ज्येष्ठता यादीनुसार श्री.लाखे यांना कनिष्ठ असलेल्या कर्मचाऱ्यांस लेखापरीक्षक श्रेणी-१ या सवंर्गातील ५२ कर्मचाऱ्यांची सुधारित निवडसूची तयार करण्यात येवून सेवा वरिष्ठ असलेले परंतू पदोन्नत न झालेले श्री. लाखे व इतर १० अशा एकूण ११ कर्मचाऱ्यांपैकी ५ कर्मचाऱ्यांना तदर्थ पदोन्नती

देण्याच्या दृष्टीकोनातून २ तदर्थ पदोन्नत सेवाजेष्ठ अधिकाऱ्यांना नियमित कोटयात पदोन्नती, ३ कर्मचाऱ्यांची पदावनती व त्या अनुषंगाने लेखापरिक्षक श्रेणी-१ या संवर्गातून विशेष लेखापरीक्षक,सहकारी संस्था,वर्ग-२ या संवर्गात ५ कर्मचाऱ्यांना तदर्थ पदोन्नती देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

सहकार विभागातील विशेष लेखापरीक्षक, सहकारी संस्था, गट-ब (वर्ग-२) या संवर्गात एकूण १८६ मंजूर पदे आहेत. त्यानुसार सन २००८ च्या अंतिम सेवाज्येष्ठता सूचीतील ज्येष्ठतेनुसार अनुक्रमांक १ येथील संदर्भाधीन शासन निर्णयान्वये तदर्थ पदोन्नती देण्यात आलेल्या खालील २ अधिकाऱ्यांना विशेष लेखापरीक्षक वर्ग-२ या संवर्गात महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधिन राहून नियमित पदोन्नतीच्या कोटयात स्थानांक देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव | प्रवर्ग | पदोन्नती चा प्रवर्ग | सध्याची पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| १ | श्री.आर.एस.भोसले | खुला | खुला | जिल्हा विशेष लेखा परीक्षक, सहकारी संस्था, वर्ग-२ (पदुम), कोल्हापूर |
| २ | श्री.डी.सी.गाडे | इ मा व | खुला | विशेष लेखा परीक्षक, सहकारी संस्था, वर्ग-२ अधिन जिल्हा विशेष लेखा परीक्षक, सहकारी संस्था, वर्ग-१, सातारा |

२. उपरोक्त विशेष लेखापरीक्षक,सहकारी संस्था, वर्ग-२ या पदावरील अधिकाऱ्यांना त्यांच्या विरुध्द कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी प्रलंबित नाही या धारणेच्या अधिन राहून स्थानांक देण्यात येत आहे.

३. श्री.मनोज सुर्यकांत लाखे, लेखापरिक्षक श्रेणी-१ यांनी त्यांना कनिष्ठ असलेल्या कर्मचाऱ्यांना देण्यात आलेल्या पदोन्नतीच्या अनुषंगाने मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल केलेल्या मूळ अर्ज क्रमांक ३२८/२०१२ मध्ये मा. न्यायाधिकरणाने पारित केलेल्या दिनांक १९/१२/२०१२ रोजीच्या आदेशानुसार तसेच श्री.लाखे यांनी दाखल केलेल्या अवमान याचिका क्रमांक ३२/२०१३ मधील दि.४.३.२०१५ च्या सुनावणीच्यावेळी मा.प्रशासकीय न्यायाधिकरणाने दिलेल्या आदेशानुसार खाली दर्शविल्याप्रमाणे श्री.मनोज सुर्यकांत लाखे व इतर ४ यांना विशेष लेखापरीक्षक, सहकारी संस्था, गट-ब (वर्ग-२) या संवर्गातील सरळसेवेच्या कोटयातील पदावर लेखापरीक्षक श्रेणी-१ या संवर्गातून विशेष लेखापरीक्षक, सहकारी संस्था, गट-ब (वर्ग-२) या पदावर संपूर्णपणे तदर्थ स्वरुपात

पदोन्नती देण्यात येत आहेत. सदर पदावर संबंधित अधिकाऱ्यांचा कायमस्वरुपी धारणाधिकार राहणार नाही.

सदर पदोन्नत्या या संपूर्णपणे तात्पुरत्या स्वरुपात असून मा. उच्च न्यायालयात प्रलंबित असलेल्या याचिका क्र.८४५४/२००४ मधील टी.ए. नं. ०१/२०१४ व टी.ए. नं. २/२००४ या संदर्भात मा. प्रशासकीय न्यायाधिकरणाने दिनांक २८/११/२०१४ रोजी दिलेल्या निर्णयातील निर्देशाच्या अधिन व त्याअनुषंगाने आरक्षण विषयक प्रलंबित असलेल्या याचिकेच्या निर्णयाच्या अधिन व लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधिन राहून देण्यात येत आहे. तसेच लोकसेवा आयोगाकडून सरळसेवेने विशेष लेखापरीक्षक, सहकारी संस्था, गट-ब (वर्ग-२) या संवर्गातील अधिकारी शासनास उपलब्ध होईपर्यन्त अथवा पदोन्नती आदेशाच्या दिनांकापासून ११ महिन्यांपर्यन्तच यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यन्त या पदोन्नत्या चालू राहतील. सदर अधिकारी पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्यापूर्वी संबंधीत अधिकाऱ्याकडून त्यांना तात्पुरत्या नियमित पदोन्नतीचा हक्क राहणार नसल्याचे लेखी बंध पत्र सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी घेवून तद्नंतर रितसर कार्यमुक्तीचे आदेश निर्गमित करण्यात यावेत.

| अ. क्र. | कर्मचाऱ्याचे नांव | जातीचा प्रवर्ग | पदोन्नतीचा प्रवर्ग | रिक्त पदावर पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| १ | श्री.ए.ए.माने | विजा-अ | खुला | विशेष लेखा परिक्षक सहकारी संस्था, वर्ग-२ (गृह-१), मुंबई |
| २ | श्री.एस.सी.रास्ते | अ.जा. | खुला | विशेष लेखा परिक्षक सहकारी संस्था, वर्ग-२ (ग्राहक), मुंबई |
| ३ | श्री.व्ही.जी.कदम | अ.जाती | खुला | विशेष लेखा परिक्षक सहकारी संस्था, वर्ग-२ (ग्राहक), कोल्हापूर |
| ४ | श्री.व्ही.डी.बेलदार | भ.ज.-ब | खुला | विशेष लेखा परिक्षक सहकारी संस्था, वर्ग-२, ठाणे |
| ५ | श्री.एम.एस.लाखे | भ.ज.-ब | खुला | विशेष लेखा परिक्षक सहकारी संस्था, वर्ग-२ (गृह-४), मुंबई |

४. सरळसेवेच्या कोटयातील पदांवर तदर्थ पदोन्नतीसाठी पात्र ठरलेल्या मागासवर्गीय अधिकाऱ्यांच्या बाबतीत त्यांच्या जाती दाव्याची वैधता सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांनी कार्यमुक्ततेचे आदेश निर्गमित करण्यापूर्वी तपासून घ्यावी.

५. उपरोक्त कर्मचाऱ्यांची विशेष लेखापरीक्षक, सहकारी संस्था, गट-ब (वर्ग-२ ) पदावरील पदोन्नती त्यांच्या विरुध्द कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी प्रलंबित नाही या धारणेच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

६. पदोन्नत अधिकाऱ्यांपैकी आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत लाभ मिळालेल्या अधिकाऱ्याव्यतिरिक्त अन्य अधिकाऱ्यांनी पदोन्नतीच्या पदावरील त्यांच्या वेतननिश्चिती संबंधीचा विकल्प पदोन्नतीच्या दिनांकापासून एक महिन्याचे आत द्यावा. अशा प्रकारचा विकल्प न दिल्यास त्यांची वेतन निश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम १९८१मधील नियम (११)(१)(ए)खाली पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन करावी.

७. सहकार आयुक्तांनी या कर्मचा-यांना दर्शविण्यात आलेल्या पदस्थापनेनुसार नियुक्तीचे सविस्तर आदेश काढावेत. तसेच सदर आदेश तात्काळ अंमलात येतील असे पहावे व कर्मचारी विहीत मुदतीत पदस्थापनेच्या जागी रुजु होतील याची दक्षता घेण्यात यावी.

८. सदर आदेश सामान्य प्रशासन विभाग यांचा अनौपचारिक संदर्भ क्र. ८१/१६ब, दि.२६/३/२०१५ व सामान्य प्रशासन विभाग यांचा अनौपचारिक संदर्भ क्र. ५९५/१२, दि. ७/४/२०१५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४२४१६४९०२१५०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Muloo Dhadwe

Digitally signed by Suresh Muloo Dhadwe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-operation marketing and textiles department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Suresh Muloo Dhadwe
Date: 2015.04.24 17:00:30 +05'30'

**( सु.मु.धाडवे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३. संचालक,वस्त्रोद्योग, महाराष्ट्र राज्य,नागपूर,
४. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
५. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, (प्रशासन व लेखा परीक्षण)

६. सर्व जिल्हा विशेष लेखापरीक्षक, सहकारी संस्था,

७. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता)

८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१०.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई

११.सर्व संबंधित अधिकारी, द्वारा सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे

१२.खाजगी सचिव मा.मंत्री (सहकार/पणन/वस्त्रोद्याग), मा.राज्यमंत्री (सहकार/पणन/वस्त्रोद्योग)

१३.प्रधान सचिव (सहकार) / प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहायक,

१४.कार्यासन अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग (१६-ब, १२), मंत्रालय, मुंबई-३२

१५.निवड नस्ती १२-स